**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १२ फेब्रुवारी, २०२५.

**पहा :-** शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४.

## परिपत्रक

शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ अन्वये सन २०२४-२५ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. सन २०२४-२५ चे सुधारित अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही सुरू असून सुधारित अंदाज निश्चित होईपर्यतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता पुढीलप्रमाणे निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात येत असून त्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात येत आहे:-

अ) खालील नमूद योजनांसाठी निधी वितरणाची मर्यादा १०० % राहिल -

- जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण/अनुसूचित जाती घटक कार्यक्रम/आदिवासी घटक कार्यक्रम)
- आमदार स्थानिक विकास कार्यक्रम
- केंद्र पुरस्कृत / बाह्य सहाय्यित योजनेतील केंद्र व राज्य हिस्सा
- केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज तसेच १५ व्या वित्त आयोगाच्या तरतूदी

ब) खालील नमूद भांडवली व महसूली लेख्यातील उद्दिष्टांसाठी निधी वितरणाची मर्यादा पुढीलप्रमाणे राहिल.

| उद्दिष्ट | निधी वितरणाची टक्केवारी | उद्दिष्ट | निधी वितरणाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| ०१-वेतन | ९५% | २४- पेट्रोल, तेल व वंगण | ८०% |
| ०२-मजूरी | ९०% | २८- व्यावसायिक सेवा | ८०% |
| ०३-अतिकालीक भत्ता | ८०% | ३४- शिष्यवृत्त्या / विद्यावेतने | १००% |
| ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च | १००% | ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | ९५% |
| ०६-दुरध्वनी,वीज व पाणी देयके | ८०% | ४५-व्याज | १००% |
| १०-कंत्राटी सेवा | ९०% | ५५-कर्ज व आगाऊ रकमा | १००% |
| १३-कार्यालयीन खर्च | ८०% | ५६-कर्जाची परतफेड | १००% |
| १४- भाडेपट्टी व कर | ८०% | ६३- आंतरलेखा हस्तांतरणे | १००% |
| २२-शस्त्रे व दारूगोळा | ८०% | ७२- यंत्रसामग्री व उपकरणे यांची देखभाल व दुरूस्ती | ८०% |

क) उपरोक्त तक्त्यात नमूद उद्दिष्टांव्यतिरिक्त महसूली व भांडवली लेख्यातील उर्वरित उद्दिष्टांसाठी निधी वितरणाची मर्यादा ७० % निश्चित करण्यात येत आहे.

ड) सदरहू उद्दिष्टांमधील ०५-बक्षीसे, १२- विदेश प्रवास खर्च, १६- प्रकाशने, १७- संगणक खर्च, २०- इतर प्रशासकीय खर्च, २६- जाहिरात व प्रसिध्दी, २७- लहान बांधकामे, ३०-इतर कंत्राटी सेवा, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), ३२-अंशदाने, ३३- अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान, ५०-इतर खर्च, ५१-मोटार वाहने, ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री, ५३-मोठी बांधकामे व ५४-गुंतवणूका या उद्दिष्टांकरीता निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनासह व उपलब्ध निधी खर्च झाल्याची खात्री करून आवश्यकतेनुसार नियोजन विभाग/ सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/ आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागाकडे दिनांक १८ फेब्रुवारी, २०२५ पर्यंत सादर करण्यात यावेत. दिनांक १८ फेब्रुवारी, २०२५ नंतर प्राप्त होणारे प्रस्ताव स्विकारले जाणार नाहीत, याची नोंद सर्व विभागांनी घ्यावी. तसेच जुलै, २०२४ व डिसेंबर, २०२४ मधील पुरवण्या मागण्यांचा निधी वितरीत करण्यापूर्वी त्यास आवश्यकतेनुसार नियोजन विभाग/ सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता पुरवणी मागणीच्या मुळ नस्तीमधून घेण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे निधी वितरीत करण्यापूर्वी दिनांक २५ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील सूचना लक्षात घेऊन निधी वितरीत करण्यात यावा.

४. अर्थसंकल्पीय तरतूदीत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पीय व्यवस्थापन नियमांतर्गत निर्धारीत केलेली वार्षिक लक्ष्ये साध्य करण्यासंदर्भात उपयुक्त ठरणार असल्याने अर्थसंकल्पीत तरतूदींचे पुनर्विनियोजन करण्याच्या प्रशासकीय विभागांच्या अधिकारांना स्थगिती देण्यात येत असून प्रशासकीय विभागांनी पुनर्विनियोजनासंदर्भात अनिवार्य खर्चासाठी वित्त विभागाची व कार्यक्रम खर्चासाठी आवश्यकतेनुसार नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेतल्याशिवाय निधीचे पुनर्विनियोजन करु नये. तसेच यापूर्वी निधी आहरित करुन बँक / स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

५. प्रशासकीय विभागांना उपरोक्त मर्यादेमध्ये उपलब्ध करुन दिलेला निधी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय कार्यालयांना वा प्रशासकीय विभागांना वितरीत करताना सदर निधी निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. **सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकारी / मंडळे / महामंडळे यांच्या बॅक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.**

६. वरीलप्रमाणे प्रशासकीय विभागाने निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. याव्यतिरिक्त, या आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदी करावयाच्या प्रस्तावासंदर्भातील कार्यवाहीबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात आलेल्या व येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०२१२१२१८४००५०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2025.02.12 12:19:39 +05'30'

( पां. जो. जाधव )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
४) सर्व मा.मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सचिव, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
८) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.
१४) निवासी लेखा अधिकारी, मुंबई-३२.
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७) निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.